**मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालयातील परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र.५/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०९ जून, २०१७

**वाचा :-** १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र.५/फ-९, दिनांक २६.१०.२०१६

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र.५/फ-९, दिनांक २९.१०.२०१६

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.४.२०१७

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. २५/२७२, दि. १७.५.२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

वार्षिक योजना सन २०१७-१८ राज्य योजनेअंतर्गत वनातील इमारती / प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४०६ ००२६) या योजनेतंर्गत रू. २५००.०० लक्ष निधी मंजूर व अर्थसंकल्पीत आहे.

मा. सचिव समितीच्या बैठकीत मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालय परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामासाठी रू.१६९५.३१ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने सन २०१६-१७ मध्ये रू.६००.०० लक्ष निधी संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला आहे. आता, संदर्भाधीन क्रमांक ४ अन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडून रू. ५००.०० लक्षचा चालू बाब प्राप्त झाला असून निधी वितरण करणेसंदर्भात विनंती केली आहे.

सबब, वार्षिक योजना सन २०१७-१८ राज्य योजनेअंतर्गत मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालय परिसरात संयुक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकामासाठी रू.५००.०० लक्ष वितरणाची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१८.०४.२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये, सन २०१७-१८ मध्ये भांडवली खर्चासाठी १००% निधी वितरित करण्यासाठी मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्रमांक ४ अन्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने वार्षिक योजना सन २०१७-१८ राज्य योजनेअंतर्गत मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर यांचे कार्यालय परिसरात संयुक्त प्रशासकीय

इमारतीचे बांधकामासाठी रू.५००.०० लक्ष इतका निधी (४४०६ ००२६) या लेखाशिर्षाअंतर्गत विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गतच्या तरतूदीचा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
२. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.
३. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक १८.४.२०१७ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
४. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.
५. मंजूर कामाव्यतीरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर / नवीन कामावर खर्च येणार नाही व कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घ्यावी. केलेल्या खर्चाचा तपशिल शासनास सादर करावा.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान लेखाशिर्ष ४४०६, वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च, राज्य योजना अंतर्गत योजना, (०१) वनीकरण, (०७०) दळणवळण व इमारती, (००) (०२) वनातील इमारती बांधकाम (४४०६ ००२६) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ करिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १७.०४.२०१५ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१२१७३८३६५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2017.06.12 17:35:39 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर.
४. उपवनसंरक्षक (प्रा.), नागपूर.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-१), मंत्रालय, मुंबई-३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)